**यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ आणि स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे यांच्या संयुक्त विद्यमानाने चालविण्यात येणा-या “शिका व कमवा” या योजनेसाठी शासनाचे सहाय्य उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मान्यता-२०१४/(१४७/१४)/तांशि-५**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार भवन,मुंबई ४०० ०३२.**
**तारीख: २९ मे, २०१५**

वाचा -

१) शासन निर्णय क्र. टिईडी २०१०/(१४४/१०)/तांशि-५, दि. २६ जुलै, २०१०.
२) संचालक, तंत्रशिक्षण महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र.१०/एनजीपी/शिका व कमवा/२०१५/२७१, दि. १.४.२०१५ व क्र.१०/एनजीपी/शिका व कमवा/२०१५/४४६ दि. १९.५.२०१५.
३) यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पत्र दि. १२.५.२०१५

**प्रस्तावना -**

यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ,नाशिक आणि स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे यांच्यामध्ये दि. २४.४.२०१५ रोजी एक सामंजस्य करार करण्यात आला आहे. उक्त सामंजस्य करारातील तरतूदीनुसार राज्यामध्ये यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठामार्फत चालविण्यात येणा-या पदविका स्तरावरील डिप्लोमा इन इलेक्ट्रीकल इंजिनिअरिंग, डिप्लोमा इन मॅकेनिकल इंजिनिअरिंग आणि डिप्लोमा इन इलेक्ट्रानिक्स अॅन्ड टेलिकम्यूनिकेशन हे तीन अभ्यासक्रम, स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने “ शिका व कमवा” या उपक्रमांतर्गत राबविण्यात येणार आहे.

१० व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत रोजदारीचा एकूण आढावा घेऊन कुशल आणि प्रशिक्षित कामगारांना प्रशिक्षण देण्याचे धोरण अवलंबिले आहे. त्यानुसार ५० कोटी कुशल व तंत्र शिक्षण आधारीत प्रशिक्षण देऊन मनुष्यबळ उत्पन्न करावयाचे आहे. “स्किल डेव्हलपमेंट इनिशिएटिव्ह” या योजनेतर्गत तंत्र शिक्षण संचालनालयाचा मोठ्या प्रमाणात वाटा असून, त्यानुसार यापूर्वीच औद्योगिक क्षेत्रामध्ये काम करीत असलेल्या विद्यार्थ्यांना किंवा औद्योगिक क्षेत्रामध्ये सामावून घेणा-या प्रशिक्षणार्थ्यांना स्किल डेव्हलपमेंट आणि स्कील अपप्रॅडेरल या कार्यक्रमात सहभाग करुन घेणे क्रमप्राप्त ठरणार आहे. याकरीता पब्लीक सेक्टर व प्रायव्हेट सेक्टर यांनी आपापसात भागीदारी तत्वावर काम करणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेऊन यशवंतराव मुक्त विद्यापीठ आणि स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे यांच्या संयुक्त विद्यामाने “शिका व कमवा” ही योजना अंमलात आली आहे. या योजनेअंतर्गत स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे या संस्थेत काही नामवंत उद्योगांबरोबर सामंज्यस करार (MOU) केले आहेत. या माध्यमातून पदविका स्तरावरील अभ्यासक्रम राज्यभरात गरीब विद्यार्थ्यांना शिकत असताना on the job प्रशिक्षण देऊन त्यांना उद्योगधंद्यामध्ये सामावून घेण्यात येणार आहे. या कालावधीत त्यांना विद्यावेतन देखील देण्यात येणार आहे. त्यामुळे गरीब विद्यार्थ्यांना मोफत तंत्र शिक्षण तसेच विद्यावेतन हे दोन्ही फायदे प्राप्त होणार आहेत. या उपक्रमांतर्गत येणारा संपूर्ण खर्च उपभोक्ता म्हणून उद्योजकांकडून सोसण्यात येणार आहे. त्यामुळे प्रत्यक्षात शासनावर कोणत्याही प्रकारचा आर्थिक भार पडणार नाही.अशा स्वरुपाची योजना संदर्भांकित दि. २६.७.२०१० च्या शासन निर्णयावर प्रथमत: यशस्वी इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे या संस्थेमार्फत राज्यात राबविण्यात आली आहे. त्याच धर्तीवर यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक आणि स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने चालविण्यात येणा-या “ शिका व कमवा” या योजनेला

शासनाचे सहकार्य देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. उक्त प्रस्तावाचा सर्वांगीण विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय-

यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ आणि स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने चालविण्यात येणा-या " शिका व कमवा" या उपक्रमांतर्गत सहभागी झालेल्या विद्यार्थ्यांना, पदविका स्तरावरील प्रशिक्षणाकरिता, शासनाचे सहकार्य म्हणून उपलब्धतेनुसार राज्यातील सर्व अखिल भारतीय तंत्र शिक्षण, नवी दिल्ली मान्यता प्राप्त तंत्र निकेतने व अभियांत्रिकी महाविद्यालये यामधील प्रयोगशाळा, कार्यशाळा, वर्गखोल्या व इतर आवश्यक सुविधा संचालक, तंत्र शिक्षण महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संचालनालयाच्या स्तरावर अवलंबिण्यात आलेल्या कार्यपध्दतीनुसार उपलब्ध करुन देण्यात याव्यात. यासाठी स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे या संस्थेने विद्यापीठाने ठरविलेल्या शिक्षण शुल्काच्या २५ टक्के इतकी रक्कम संबंधित संस्थाना भाड्यापोटी अदा करणे आवश्यक राहील.

२."शिका व कमवा" या उपक्रमातर्गत सहभाग असलेल्या सर्व विद्यार्थ्यांना on the job Training ( कामावर असतानाचे प्रशिक्षण) उद्योग व व्यवसाय मध्ये देण्यात येते. सदर शिक्षण पूर्ण झाल्यानंतर त्यांना अभियांत्रिकी पदविका प्रमाणपत्र यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठामार्फत देण्यात येणार आहे. ही बाब विचारात घेऊन, प्रशिक्षणार्थींना "Apprenticeship Act, १९६१" मधील तरतूदीचे तंतोतंत पालन करण्याच्या अटीच्या अधीन राहून अभ्यासक्रमाच्या कालावधीत Apprentice म्हणून संबोधण्यात यावे.

३. उक्त प्रशिक्षणार्थींचा प्रशिक्षणाचा कालावधी ४ वर्षापलिकडे जाणार नाही याची काळजी विद्यापीठाने घ्यावी. तसेच विद्यार्थ्यांना "Apprenticeship Act, १९६१" मधील तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरविलेले किमान विद्यावेतन किंवा उद्योजक यापेक्षा जास्त विद्यावेतन देऊ इश्चित असेल तर ते विद्यावेतन संबंधित उद्योजक यांजकडून देण्यात यावे.

४. विद्यार्थ्यांसाठी साधन सामग्री, पाठ्यपुस्तके व साहित्य इत्यादी आणि प्रशिक्षणावरील इतर सर्व खर्चाचा भार ज्या उद्योगांच्या कारखान्यामध्ये विद्यार्थी प्रशिक्षण घेत असतील त्या उद्योजक आस्थापना सोसतील.

५. सर्व सहभागी विद्यार्थ्यांचा विमा उतरविण्यात यावा तसेच त्यांच्या सुरक्षितता व वैद्यकीय देखभाली संदर्भात आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

६. उपलब्ध सुविधांचा विचार करुन या योजनेमध्ये सहभागी होण्याचा निर्णय घेण्याची मुभा संस्थांना राहील. यासाठी संस्थांनी आवश्यकतेनुसार स्वामी विवेकानंद इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे या संस्थेशी स्वतंत्र करारनामा करावा. त्यामध्ये स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, चिंचवड, पुणे संस्थेच्या पदाधिका-यांकडून चांगल्या वर्तणूकीची हमी घेण्यात यावी.

७. या सुविधा यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांच्यामार्फत स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे या संस्थेस अभ्यासक्रम चालविण्यासाठी दिलेल्या मान्यतेच्या कालावधीपुरत्या मर्यादित राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२९१७४१०६३१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DHARURKAR SANJAY AUDUMBAR

Digitally signed by DHARURKAR SANJAY AUDUMBAR
DN: CN = DHARURKAR SANJAY AUDUMBAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = H AND T E, CID - 917065
Date: 2015.05.29 17:41:49 +05'30'

**(संजय औ. धारुरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. कुलगुरु, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक.
३. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे(पू) मुंबई - ५१.
४. सर्व प्राचार्य, शासकीय/अशासकीय तंत्र निकेतने (संचालनालयामार्फत).
५. सर्व प्राचार्य, शासकीय/अशासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये (संचालनालयामार्फत).
६. मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
७. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
८. सचिव, स्वामी विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, ०८/४, पूर्णा नगर, चिखली रोड, चिंचवड, पुणे.
९. निवड नस्ती.